**अग्रीम अनुदान वाटप- २०११-१२**
**जिल्हा परिषद आणि पंचायत समित्या**
**यांच्या पोटनिवडणूका**

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक: जिपनि-२०११/प्र.क्र.५/पंरा-२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ९ डिसेंबर, २०११

वाचा:- १.ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र. जिपनि-२०११/प्र.क्र.५/पंरा-२, दि.४.६.२०११ व दि.१३.९.२०११.
२. राज्य निवडणुक आयोग यांचे पत्र क्र.रानिआ / जिपपंस-२०११/प्र.क्र.१३, दि.४.१०.२०११ व दि.२५.१०.२०११ चे पत्र.

**शासन निर्णय:-**

सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षासाठी "मागणी क्र. एल-२, २०५३, जिल्हा प्रशासन (०२) जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्या निवडणुकासंबंधातील खर्च- (०२) (०१) जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्या निवडणुकासंबंधातील खर्च- (२०५३ ०५२९) दत्तमत (योजनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली सन २०११-२०१२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर केलेल्या (१३) कार्यालयीन खर्च/अस्थायी पदांच्या (०१) वेतनासाठी एकूण रु.६०,२१,००,०००/- (रूपये साठ कोटी एकवीस लक्ष फक्त) इतक्या अर्थसंकल्पिय तरतुदी मधून आतापर्यंत रु.१,१३,२४,५७८/- इतका निधी वितरित करण्यात आला आहे.

जिल्हा परिषद / पंचायत समितीच्या आगामी सार्वजनिक निवडणुकीच्या अनुषंगाने संबंधित २७ जिल्हयांमध्ये निवडणूक विषयक कामकाज सुरु करण्यात आले असून त्या कामकाजासाठी अनुदानाची मागणी काही जिल्हाधिकारी यांनी शासनाकडे केली आहे. प्रस्तुत मागणी विचारात घेवून उर्वरित तरतूदीमधून आगामी जिल्हा परिषदा व पंचायत समित्या-२०१२ सार्वत्रिक निवडणुकीचा कार्यालयीन खर्च भागविण्याकरीता प्रत्येकी रु.५.०० लाख (रुपये पाच लाख फक्त) **अग्रीम** रक्कम संबंधित जिल्हयांना खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्यानुसार मंजूर करण्यात येत असून विवरणपत्रात दर्शविल्यानुसार **एकूण रु.१,३५,००,०००/- (रूपये एक कोटी पस्तीस लक्ष फक्त)** इतके अनुदान संबंधित जिल्हाधिकाऱ्यांकडे सुपुर्द करण्यात येत आहे.

(अ) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान हे शासनाने वेळोवेळी निश्चित केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन आहे.

(ब) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान हे राज्य निवडणूक आयोगाने वरिल संदर्भ क्र.२ मधील पत्रान्वये जाहीर केलेल्या मार्च, २०१२ मध्ये होणाऱ्या जिल्हा परिषद व पंचायत समितीच्या सार्वत्रिक निवडणूकांचा खर्च भागविण्याकरिताच वापरण्यात यावे.

(क) मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही व कोणतीही अनियमितता घडणार नाही याची दक्षता संबंधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी.

(ड) ह्या अनुदानातून होणाऱ्या खर्चाची मासिक विवरणपत्रे (उपयोगिता प्रमाणपत्रे) जिल्हाधिकारी यांनी विभागीय आयुक्त व शासनाकडे प्रत्येक पुढील १५ तारखेपूर्वी सादर करावीत. खर्चावर नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

(ई) सदर अनुदान अर्थसंकल्प वितरण प्रणालीनुसार जिल्हाधिकारी यांचा युजर आयडी क्रमांक ०००९३०/उप जिल्हा निवडणूक अधिकारी युजर आयडी क्रमांक ०००९३४ किंवा जिल्हाधिकारी यांचे प्रमुख लिपिक युजर आयडी क्रमांक ०००९४८ (Head Clerk to theCollecter) यांच्या युजर आयडीवर वितरीत करण्यात येत आहे.

उपरोक्त प्रयोजनार्थ होणारा खर्च हा "मागणी क्र. एल-२, २०५३, जिल्हा प्रशासन (०२) जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्या निवडणुकासंबंधातील खर्च- (०२) (०१) जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्या निवडणुकासंबंधातील खर्च- (२०५३ ०५२९) दत्तमत १३ कार्यालयीन खर्च ०९३ (०२) (०१) (योजनेत्तर)" या लेखाशिर्षाखालील सन २०११-२०१२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णयाची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्यांचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१११२०९०६०२१३००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(गजानन दा.लाभे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, (सर्व).
२) सर्व जिल्हाधिकारी, (धुळे, नंदुरबार, वाशिम, अकोला, भंडारा व गोंदिया वगळून).
३) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई, नागपूर
४) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व परिक्षण) मुंबई, नागपूर
५) उपायुक्त, राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र राज्य, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
६) सर्व जिल्हा लेखा कोषागार अधिकारी, (धुळे, नंदुरबार, वाशिम, अकोला, भंडारा व गोंदिया वगळून).
७) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.(दोन प्रती)
८) कार्यासन क्रमांक वित्त-१, वित्त-७ व वित्त-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) वित्त विभाग, (अर्थसंकल्प- १७ व व्यय-१५), मंत्रालय, मुंबई.
१०) निवड नस्ती कार्यासन क्र. पंरा-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.

# विवरणपत्र

शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.जिपनि-२०११/प्र.क्र.५/पंरा-२,
दि. ९ डिसेंबर, २०११ चे सहपत्र.

(रुपये हजारात)

| अ. क्र. | जिल्हा | या आदेशान्वये मंजूर करण्यात येत असलेले अनुदान |
|---|---|---|
| १ | ठाणे | ५०० |
| २ | रायगड | ५०० |
| ३ | रत्नागिरी | ५०० |
| ४ | सिंधुदुर्ग | ५०० |
| ५ | नाशिक | ५०० |
| ६ | जळगांव | ५०० |
| ७ | अहमदनगर | ५०० |
| ८ | पुणे | ५०० |
| ९ | सातारा | ५०० |
| १० | सांगली | ५०० |
| ११ | सोलापूर | ५०० |
| १२ | कोल्हापूर | ५०० |
| १३ | औरंगाबाद | ५०० |
| १४ | जालना | ५०० |
| १५ | परभणी | ५०० |
| १६ | हिंगोली | ५०० |
| १७ | बीड | ५०० |
| १८ | नांदेड | ५०० |
| १९ | उस्मानाबाद | ५०० |
| २० | लातूर | ५०० |
| २१ | अमरावती | ५०० |
| २२ | बुलडाणा | ५०० |
| २३ | यवतमाळ | ५०० |
| २४ | नागपूर | ५०० |
| २५ | वर्धा | ५०० |
| २६ | चंद्रपूर | ५०० |
| २७ | गडचिरोली | ५०० |
| **एकूण** | | १३५०० |

(रुपये एक कोटी पस्तीस लाख फक्त)

**(गजानन दा.लाभे)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

D:\Year-2011\CR-5-2011.doc